**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत सर्वसाधारण बालकांसाठी मंजूर केलेल्या अधिक २५ पैसे तरतूदी मधून सुक्ष्मपोषकतत्वयुक्त स्प्रिंकल्स चा पुरवठा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय ,क्रमांक :एबावि २०११/प्र.क्र. २०७ /का-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३० जुलै, २०११

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे पत्र क्रमांक एबाविसे/का-२ /२७४९ /२०११, दिनांक २७.६.२०११

**शासन निर्णय :-** एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत नागरी व ग्रामीण प्रकल्पातील ३ ते ६ वर्षे वयोगटातील १५३६०६८सर्वसाधारण बालकांना सन २०११-१२ हया वर्षासाठी सर्वसाधारण बालकांसाठी मंजूर केलेल्या अधिक २५ पैसे उपलब्ध तरतूदीतून DMER च्या दरकरारावरील प्रति साचेट दर रु ५.८१ + १ % वॅट = रू ५.८७ या दराने सुक्ष्मपोषकतत्वयुक्त स्प्रिंकल्स चे प्रति आठवडयास एक याप्रमाणे ९ आठवडयासाठी १५३६०६८ x ९ x ५.८७ = ८,११,५०,४७२ रकमेचे एकूण १३८२४६१२ साचेट खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु ८,११,५०,४७२/- (अक्षरी रु आठ कोटी अकरा लाख पन्नास हजार चारशे बहात्तर फक्त ) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये खालील अटी नुसार मान्यता देण्यात येत आहे.

i) उपलब्ध तरतूदीतून विहीत पध्दतीचा अवलंब करून खरेदी करण्यात यावी.

ii) पुरवठयाच्या वेळी उत्पादन दोन महिन्याच्या आतील असावे व मुदतबाहयतेचा कालावधी (Expiry Date) एक वर्षापेक्षा कमी नसावा ,

iii) पुरवठा दाराने मागणी प्रमाणे विहीत प्रमाणात , विहीत केलेल्या गुणवत्ते नुसार निश्चित केलेल्या ठिकाणी मालाचा पुरवठा करण्यात आलेला आहे व २५ पैसे प्रमाणे उपलब्ध होणा-या निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याबाबतची खात्री करण्यात यावी. खरेदी / वाटप / पुरवठा व जादा खर्च यामध्ये अनियमितता झाल्यास त्याची जबाबदारी आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांची राहील.

iv) तसेच या योजनेचा लाभ लाभार्थ्यांना पोहचावा या दृष्टीने किती प्रमाणात सुक्ष्मपोषकतत्वयुक्त स्प्रिंकल्स किती प्रमाणात दयावे याबाबत स्वंयस्पष्ट माहिती पत्रक , अगणवाडयात नोंदवहीमध्ये औषधाच्या उत्पादनाचा दिनांक / एकूण पुरवठा / एकूण उपयोग / मुदत बाहयतेचा दिनांक व शिल्लक याबाबतची योग्य नोंद ठेवण्याबाबत , औषधी घटक विहीत प्रमाणानुसार असल्याचे प्रयोगशाळेतून तपासून खात्री करणे , त्याची नोंद ठेवणे , इ. बाबत उचित **मार्गदर्शक सूचना** आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांनी दयाव्यात.

२. यासाठी होणारा खर्च सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात २२३६-पोषण आहार,०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, (०३) (०१) - महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (२२३६००२७) (स्थानिक क्षेत्र) - १९ आहार खर्च आणि २२३६-पोषण आहार , ०२ पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, नागरी (०१) (०१) पोषण आहार कार्यक्रम (२२३६०१८१), १९ आहार खर्च या लेखाशिर्षा खाली भागविण्यात यावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. याकरिता आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांना आहरण, संवितरण व नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक खर्चनि-१००६/प्र.क्र.१/अर्थोपाय, दि.२०.४.२००६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(श.पा.वारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे
संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा, (आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे मार्फत)
संबंधित उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण ), (आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे मार्फत)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
ग्रथालय, विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांचे मार्फत)
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-
क.अ. का-४ (अर्थसंकल्प) महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (कार्यासन-५)